आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ करीता महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित अनुदान या योजनेंतर्गत नंदुरबार आणि नाशिक जिल्ह्यातील विविध वीज विषयक कामांकरिता रू. २५.०० कोटी निधी रोखीने वितरीत करणेबाबत. (लेखाशिर्ष-२८०१ ५०८९)

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा ,कामगार व खनिकर्म विभाग

## शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२४/प्र.क्र.४६/ऊर्जा-५

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ३० मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, उ,ऊ,का व खनिकर्म विभाग, क्र: संकिर्ण-२०२३ /अनौ.क्र.२२/ऊर्जा-५,दि. १०.०१.२०२४.
२. शासन निर्णय, उ,ऊ,का व खनिकर्म विभाग, क्र: संकिर्ण-२०२३ /अनौ.क्र.११/ऊर्जा-५,दि. २५.०१. २०२४.
३. शासन निर्णय, उ,ऊ,का व खनिकर्म विभाग, क्र: संकिर्ण-२०२४ /प्र.क्र.४६/ऊर्जा-५,दि. २६.०२. २०२४.
४. शासन निर्णय, उ,ऊ,का व ख.विभाग, क्र: संकिर्ण-२०२४ /प्र.क्र.०४/ऊर्जा-५,दि. १२.०३.२०२४.
५. शासन निर्णय, उ,ऊ,का व ख.विभाग, क्र: संकिर्ण-२०२३ /प्र.क्र.४९०/ऊर्जा-५, दि. १३.०३.२०२४
६. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र: बीयुडी-२०२४/प्र.क्र.०९/कार्या-६, दि. २२.०३.२०२४.
७. शासन निर्णय, उ,ऊ.का व खनिकर्म विभाग, क्र: संकिर्ण-२०२४ /प्र.क्र.४६ /ऊर्जा-५,दि. २६.०३. २०२४.
८. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र: बीयुडी-२०२३/प्र.क्र.०९/कार्या-६, दि. ३०.०३.२०२४.

**प्रस्तावना:-**

आदिवासी उपयोजनेअंतर्गत नंदुरबार आणि नाशिक जिल्ह्यातील विविध वीज विषयक कामांकरिता एकूण रु.५००२७.०१ लाख इतक्या प्रकल्प रक्कमेस संदर्भाधिन शासन निर्णय क्र.१ ते ५ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर कामांकरीता संदर्भाधिन क्र.७ येथील शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील आदिवासी उपयोजनेअंतर्गत लेखाशिर्ष २८०१ ५०८९ अंतर्गत रु.२५.०० कोटी इतका निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्यात आला आहे.

आता, संदर्भिय शासन निर्णय क्र.(८) अन्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील आदिवासी उपयोजनेअंतर्गत लेखाशिर्ष २८०१ ५०८९ अंतर्गत रु.२५.०० कोटी आदिवासी विकास विभागाने प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव (ऊर्जा) यांना बीम्स प्रणालीवर वितरीत केले आहेत.

त्याअनुषंगाने सदर रु.२५,००,००,०००/-(रुपये पंचवीस कोटी फक्त) निधी महावितरण कंपनीस प्रकल्पनिहाय वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२३-२४ वर्षात "महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनीस अनुदान" या योजनेतंर्गत नंदुरबार आणि नाशिक जिल्ह्यातील विविध वीज विषयक खालील तक्त्यातील कामांकरिता एकूण रु.२५,००,००,०००/- (रुपये पंचवीस कोटी फक्त) महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

**(रू. लाखात)**

| अ. क्र. | कामांचे नाव | प्र.मा. किंमत | यापूर्वी वितरीत केलेला निधी | सदर शा.नि.अन्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | नंदूरबार जिल्ह्यातील वाडी पाडयातील अपांरपारिक पध्दतीने विद्युतीकरण झालेल्या घरांचे व सन २०११ च्या जनगणनेनंतरच्या विस्तारीत वाडी पाडयातील घरांचे पारंपारीक पद्धतीने विद्युतीकरण. | रु.३९८९५.०० | रु.२०४९.६० | रु.१६६६.९६ | रु.३७१६.५६ |
| २ | गमन ता. अक्कलकुवा जि. नंदुरबार येथे ३३/११ के.व्ही. क्षमतेचे नविन उपकेंद्र उभारणे. | रु.८३८.४३ | - | रु.८३.८४ | रु.८३.८४ |
| ३ | नाशिक जिल्ह्यातील दिंडोरी पेठ मतदार संघातील विविध विद्युत विषयक कामे. | रु.७४९२.०० | - | रु.७४९.२० | रु.७४९.२० |
| ४. | अहमदनगर जिल्ह्यातील अकोले व संगमनेर तालुक्यातील आदिवासी भागातील वाड्यावस्त्यांचे पारंपारिक पध्दतीने विद्युतीकरण करणे. | रु.९७६.९० | रु.२४४.२३ | - | रु.२४४.२३ |
| ५. | नाशिक जिल्ह्यातील कळवण तालुक्यातील आदिवासी भागातील विविध विद्युत विषयक कामे करण्याकरिता. | रु.८२४.६८ | रु.२०६.१७ | - | रु.२०६.१७ |
| | | **एकूण:-** | **रू. २५००.००** | **रू. २५००.००** | **रु.५०००.००** |

२. वरील बाबींचा खर्च मागणी क्र.टी-५, २८०१, वीज उपमुख्य लेखाशिर्ष-८० सर्वसाधारण, गौणशिर्ष-७९६ जनजाती क्षेत्र योजना, गटशिर्ष-(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना उप गट शिर्ष योजना (०१) (०३)

महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनीस अनुदान योजना सांकेतांक (२८०१ ५०८९) (राज्यस्तरीय योजना) (कार्यक्रम) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून डॉ.गौरी पाटील, कार्यासन अधिकारी (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ना.श्री.कराड, उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रु.२५,००,००,०००/-(रु.पंचवीस कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम नंदुरबार आणि नाशिक जिल्ह्यातील वरील तक्त्यात दर्शविल्यानुसार विविध वीज विषयक कामांकरिता खर्च होईल याची दक्षता उप सचिव, ऊर्जा-५ व महावितरण कंपनीने घ्यावी.

५. ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल. तसेच मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत विहित वेळेत प्रकल्प पूर्ण करण्याची जबाबदारी महावितरण कंपीनीची राहील. त्यांनी याकरिता जबाबदार अधिकाऱ्यास नामनिर्देशित करावे.

६. सदर उपलब्ध करून दिलेल्या तरतुदीतुन झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

७. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

८. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर देयक हे सर्शत असून,वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३च्या परिपत्रकातील सोबतच्या परिशिष्टातील अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.४२४/२०२४/व्यय-१४, दिनांक ३०.०३.२०२४ च्या मान्यतेनुसार निर्गमित केलेल्या आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२३/प्र.क्र.०९/कार्यासन-६, दिनांक ३०.०३.२०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३३०१७३९४९४३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.03.31 12:55:37 +05'30'

**( ना. श्री. कराड )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (ऊर्जा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई-३२.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उ.ऊ.का.व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१४.अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१५.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक.
१६.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नंदुरबार.
१८.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
१९.महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
२०.कोषागार अधिकारी, नाशिक व नंदुरबार.
२१.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२२. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
२३.अवर सचिव (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२४.कार्यासन अधिकारी (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२५.कार्यासन अधिकारी (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
२६.कार्यासन अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२७.निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२८.ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.